२००९११३१८३५११००१

**राज्यातील सर्व महसूल मंडळ मुख्यालयाच्या**
**ठिकाणी ग्राम सचिवालय योजना राबविण्याबाबत**

महाराष्ट्र शासन
ग्राम विकास व जलसंधारण विभाग,
शासन निर्णय क्र.ग्रासयो २००९/प्र.क्र. ९८ /पं.रा.९
मंत्रालय,मुंबई-४०००३२.
दिनांक :- ३ नोव्हेंबर २००९.

**वाचा** :- (१) शासन निर्णय,ग्राम विकास व जलसंधारण विभाग क्र.आयएनएफ १०९८/प्र.क्र.३३२३/३९,दिनांक २७ डिसेंबर १९९९.
(२) शासन निर्णय,ग्राम विकास व जलसंधारण विभाग क्र.आयएनएफ २००२/प्र.क्र.३९५/४८,दिनांक २एप्रिल २००२.
(३) शासन निर्णय,ग्राम विकास व जलसंधारण विभाग क्र.आयएनएफ २००२/प्र.क्र.५८५/पं.रा.९,दिनांक १९ ऑक्टोबर २००२.

**शासन निर्णय :-**

राज्यातील सर्व महसूल मंडळ मुख्यालयाच्या ठिकाणी ग्राम सचिवालय योजना राबविण्याचा निर्णय शासनाने घेतला असून त्या अनुषंगाने ग्राम सचिवालय या योजने अंतर्गत सर्व कार्यालये एकत्र आणण्याचा निर्णय संदर्भाधीन (१) येथील शासन निर्णय, दिनांक २७ डिसेंबर १९९९ न्वये निर्गमित केलेला आहे.

२. गाव पातळीवर महत्वांच्या खात्यांचा समन्वय रहावा व जनतेची नित्याची कामे त्वरेने व्हावीत या दृष्टीकोनातून राज्यातील सर्व महसूल मंडळाच्या मुख्यालयी ग्राम सचिवालय व्हावीत म्हणून ग्राम सचिवालयाची निर्मिती केलेली असून संदर्भाधीन (१) येथील दिनांक २७ डिसेंबर १९९९ च्या शासन निर्णयातील मुद्दा क्र.६ -ब मध्ये नमूद केल्यानुसार ग्राम सचिवालयामध्ये महसूल मंडळ मुख्यालयातील इतर कार्यालये आणण्याची व समन्वयाची जबाबदारी जिल्हाधिकाऱ्यांची आहे. सदर शासन निर्णयातील ७ मध्ये या ग्राम सचिवालयामध्ये ग्रामपंचायत कार्यालय,महसूल मंडळ कार्यालय,तलाठी कार्यालय,सहकारी संस्थेचे कार्यालय,महिला व बाल विकास कार्यालय,महाराष्ट्र राज्य विद्युत मंडळाचे कार्यालय,कृषि विभागाचे कार्यालय व पाटबंधारे विभागाचे कार्यालय याचा समावेश करावयाचा असून जागेच्या उपलब्धतेनुसार महसूल मंडळ मुख्यालयी असणाऱ्या इतर शासकीय कार्यालय देखील ग्राम सचिवालयामध्ये समावून घ्यावयाचे आहे.

**कृ.मा.प...**

E:\G.R.3323-26-10-2009.lwp

३. दिनांक २७ डिसेंबर १९९९ च्या मुद्दा क्र.७ नमूद केलेल्या कार्यालयांसह आदिवासी बहुल क्षेत्रात व वन क्षेत्रातील ग्रामपंचायतींमध्ये आदिवासी विभागाच्या व वन विभागाच्या अधिकाऱ्यांना एक कक्ष किंवा सदर शासन निर्णयात नमूद केल्याप्रमाणे जागा उपलब्ध करुन देण्यात यावी.

४. अशाप्रकारे या खात्यांना देण्यात येत असलेल्या कार्यालयीन जागेचे भाडे संबंधित ग्रामपंचायतीने निश्चित करावे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

(दि.ग.मोरे )
उप सचिव,महाराष्ट्र शासन.

प्रत :-

१ मा.मुख्यमंत्री यांचे कार्यालय
२ मा.उपमुख्यमंत्री यांचे कार्यालय
३ मा.मंत्री (सर्व) यांचे खाजगी सचिव.
४ मा.राज्यमंत्री (सर्व) यांचे खाजगी सचिव.
५ मा.मुख्य सचिव यांचे कार्यालय
६ मा.अप्पर मुख्य सचिव:/प्रधान सचिव/सचिव सर्व मंत्रालयीन विभग
७ विभागीय आयुक्त(सर्व)
८ प्रधान वनसंरक्षक,वन विभाग,नागपूर.
९ जिल्हाधिकारी (सर्व )
१० मुख्य कार्यकारी अधिकारी (सर्व)
११ आयुक्त,आदिवासी विकास विभाग
१२ निवड नस्ती (पं.रा.९)